*मिथक Myth  मिथिला मैथिली mythology मिथ्या,*

"ब्रह्म सत्य जगत मिथ्या" आदि शंकराचार्यांनी सांगितलेला अद्वैत वेदांतील एक मुख्य सिद्धांत.

ब्रह्माचे वर्णन 'वस्तुपरिच्छेद शून्यम्, देशपरिच्छेद शून्यम्, तथा कालपरिच्छेद शून्यम्।' असे केले आहे .

पदार्थ, स्थान आणि काळ अशी कोणतीही सीमा नसलेले ते  *ब्रह्म* . आणि भौतिक जगाला मात्र मिथ्या म्हटले आहे.

मिथ्या म्हणजे अवास्तविक, किंवा भ्रम.

मिथ्या शब्दाचा मूळ धातु 'मिथ्'.

मिथ् चा  संस्कृत अर्थ मेधाहिंसनयोः'. दोन शब्द येथे वापरले आहेत.

मेधा म्हणजे बुद्धी.

आता खरोखर संभ्रम निर्माण झाला आहे. मेधाहिंसनयोः म्हणजे नक्की काय.

तर हा एक सामासिक शब्द आहे. ज्याचा अर्थ मेधा सुद्धा आणि हिंसा सुद्धा.

हे समजून घेण्यासाठी एक उदाहरण पाहू. पाणी मीठ साखर लिंबू हे निरनिराळे पदार्थ आहेत. ते एकत्र केले असता त्यांचे मूळ स्वतंत्र गुणधर्म नष्ट (हिंसा) झाले आणि त्यापासून तयार झाले चवदार सरबत. आणि हे करण्यासाठी बुद्धिचा वापर करावा लागला. म्हणून हे मेधाहिंसनयोः. बुद्धी न वापरता हिंसा अजिबात करायची नाहीये. सरबताची भ्रम निर्माण करणारी अवस्था लक्षात घेतली कि मिथ् धातु चा अर्थ छान समजतो.

हे जग खूप सुंदर आहे भूरळ पाडणारे आहे पण शाश्वत नाही. आज सुंदर दिसले तर उद्या विनाश झालेले विद्रूप सुद्धा दिसेल. म्हणून 'जगत मिथ्या '.

मिथ् धातु चे निरनिराळे अर्थ आहेत जसे मारणे, इजा करणे, मिलन होणे, अपशब्द बोलणे इत्यादी. आता ह्या धातुपासून निर्माण झालेले निरनिराळे शब्द पाहू.

जनक राजाची राजधानी मिथिला नगरी.

जनकाच्या जन्माची कथा संभ्रम निर्माण करणारी. अशी आख्यायिका आहे की जनकाच्या मृत पित्याच्या शरीरापासून ह्यांना निर्माण केले गेले.

जनक राजा कर्तबगार तर होताच, त्याच्या राज्यातील व्यवस्था अतिशय आदर्श अशी होती जणू काही हा एक भ्रमच वाटावा . (असे पण राज्य असू शकते!)

अतिशय निस्वार्थी आणि अहंकार रहीत असा तो  आत्मज्ञानी राजा होता. म्हणजे सर्व काही कल्पनातीत. मनाला भूरळ पाडणारे, अविश्वसनीय. अशा राजाची नगरी ती मिथिला नगरी.

अष्टाध्यायी सूत्रातील 'समर्थः पदविधिः' (2.1.1) ह्या सूत्राप्रमाणे एखादे नवीन पद तयार होत असताना ते मूळ शब्दानुरूप, त्याच्या अर्थाशी साधर्म्य ठेवणारे असावे. त्या नवीन पदाचे तेच ते 'सामर्थ्य '. म्हणून कुंती पासून कौन्तेय. मिथिला पासून मैथिली. सीतेचे दुसरे नाव मैथिली. मग मैथिली भाषा, मैथिली चित्रकला वगैरे.

हे असे शब्दांचे नियम समजावून सांगणारा ग्रंथ पतंजली मुनींनी लिहिला ज्याला महाभाष्य असे म्हणतात. ज्याची सुरवातच केली आहे 'शब्दानुशासन' ह्या पदापासून, म्हणजे शब्दांचे व्याकरण आणि त्यांच्या  नियमांचे अध्ययन/ अनुशासन.

ग्रीक भाषेत एक शब्द आहे 'Mythos ' त्याचे मूळ मिथ् हेच असावे. Mythos ह्या मूळ शब्दाचा अर्थ शब्द, बोलणे, कहावत ज्याचा हळूहळू अर्थ बदलत जाऊन ती झाली गोष्ट, दंतकथा. अशी कथा ज्याला ऐतिहासिक संदर्भ नाही. ह्या सर्वांचा अभ्यास म्हणजे Mythology.

खरेतर पुराण ह्या शब्दाचा अर्थ पूर्वी घडून गेलेले. पण ब्रिटिशांनी आपल्या पुराणे, रामायण, महाभारताला mythology म्हणून टाकले.

अशा मिथ् धातुपासून अनेक शब्द निर्माण झाले.

मराठीत मिथक.

मैथुनम् म्हणजे विवाह.

